


महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
दुसरा मजला, मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२

दूरध्वनी क्र ०२२ २२७९ ३३६८.

क्रमांक - वैमाशा-२०२१/४७९/प्र.क्र.१११/ग्रासं-३ दि. २८ जानेवारी, २०२२

**<u>संदर्भ :</u>**- १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. सेनिवे-१००१/ १३० / सेवा-४, दि. २ जून, २००३
२) शासन आदेश क्रमांक - बदली - २०१९ / प्र.क्र.११६ / ग्रासं-३, दि.२५/१०/२०१९
३) शासन आदेश क्रमांक - वैमाशा - २०२१ / प्र.क्र.१८ / ग्रासं -३ दि.०९/०८/२०२१
४) नियंत्रक, वैमाशा यांचे पत्र क्र. वैमाशा /आस्था-२/क.दे.वि./निरी/२०२१/१५४७, दि. २९/१०/२०२१

## <u>कार्यालयीन आदेश</u>

श्री. कमलाकर बिराजदार, निरीक्षक, वैध मापन शास्त्र हे निरीक्षक, वैध मापन शास्त्र, पुणे विभागीय कार्यालय, पुणे या पदावर कार्यरत असताना संदर्भ क्र. २ च्या आदेशानुसार श्री. सि. द. ढवणे, (नियुक्तीच्या प्रतिक्षेत असलेले) निरीक्षक, वेध मापन शास्त्र यांची पुणे विभागीय कार्यालय, पुणे येथे दिनांक ९ डिसेंबर, २०१९ (म.नं.) रुजू झाल्याने श्री. कमलाकर बिराजदार यांना दिनांक ९ डिसेंबर, २०१९ (म.नं.) रोजी कार्यमुक्त करण्यात आले. संदर्भ क्र. ३ च्या आदेशानुसार श्री. कमलाकर बिराजदार, निरीक्षक यांना भिवंडी-२ विभाग, जि. ठाणे या पदावर बदलीने पदस्थापना दिल्यानंतर ते बदलीच्या ठिकाणी दिनांक ११ ऑगस्ट, २०२१ (म.पू.) रोजी रुजू झाले.

०२. श्री. कमलाकर बिराजदार, निरीक्षक, वेध मापन शास्त्र, भिवंडी -२ रा विभाग, जि. ठाणे यांना दि. ९/१२/२०१९ ते दि. १०/८/२०२१ या कालावधीत प्रशासकीय कारणास्तव पदस्थापनेकरीता सक्तीने प्रतीक्षेत रहावे लागले, याकरीता ते व्यक्तीश: जबाबदार नाहीत.

०३. श्री. कमलाकर बिराजदार, निरीक्षक, वैध मापन शास्त्र, भिवंडी-२ रा विभाग, जि. ठाणे यांचा दि. ९/१२/२०१९ ते १०/८/२०२१ हा सक्तीचा प्रतिक्षा कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९ (१४) (फ) अन्वये “कर्तव्य कालावधी” म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

०४. श्री. कमलाकर बिराजदार, निरीक्षक, वैध मापन शास्त्र यांना दि. ०९/१२/२०१९ ते दि. १०/८/२०२१ या कालावधीतील अनुज्ञेय वेतन व भत्ते अदा करण्यास नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

०५. हे आदेश वित्त विभाग क्र. सेनिवे - १००१ / १३० / सेवा-४, दि. ०२.०६.२००३ व शासन अधिसूचना, वित्त विभाग क्र. संकीर्ण - २०१५ /प्र.क्र.२७ / सेवा-६, दि. ०३,०३,२०१६ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सक्षम प्राधिका-याचे मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०१२८१५४२५६३२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHITAL ANAND RAMTEKE

Digitally signed by SHITAL ANAND RAMTEKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=250b23140177f1b91b8d23d0003fea615e62e9fa665cd65cd822d17139dee73b, pseudonym=6E8363396B2786A7F9280A0F6B79E9C7BC0E7B56, serialNumber=7D5A263499F325CA90E9E04FA83D69E04FD5CB75F96BB3FC42610EB9D879192B, cn=SHITAL ANAND RAMTEKE
Date: 2022.01.28 15:43:52 +05'30'

**( शितल रामटेके )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

श्री. कमलाकर बिराजदार, निरीक्षक, वैध मापन शास्त्र, भिवंडी - २ रा विभाग, जि. ठाणे
(नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुख्यालय, मुंबई यांचे मार्फत)

**प्रति,**

१) नियंत्रक, वेध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुख्यालय, मुंबई.
२) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१ मुंबई
३) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
४) सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, कोकण विभाग, कोकण विभागीय कार्यालय, नवी मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / पालघर
६) निवडनस्ती (ग्रासं-३).